**२४ ते २८ फ़ेब्रुवारी, २०२३ या कालावधीत टेबल टेनिस हॉल, चंदिगड येथे आयोजित अखिल भारतीय नागरी सेवा टेबल टेनिस स्पर्धा २०२२-२३ मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी होणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अभानासे-३०२३/प्र.क्र.१७०/क्रीयुसे-२,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २० फ़ेब्रुवारी, २०२३.

**वाचा:-** १. केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ यांचे पत्र क्रमांक- ५९/२/ २०१९-२०/CCSCSB, दि.१२.१२.२०२२.
२. महासचिव, सचिवालय जिमखान्या यांचे पत्र क्र.-अभानासे/ टेबल टेनिस/२०२२-२३ दि.०२.०२.२०२३.
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग,मुंबई यांचे पत्र क्रमांक-उपसंक्री/ अभानासे/२२-२३/का-४/१९२, दि.१३.०२.२०२२.

**शासन निर्णय :-**

दिनांक २४ ते २८ फ़ेब्रुवारी, २०२३ या कालावधीत टेबल टेनिस हॉल, चंदिगड येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा टेबल टेनिस स्पर्धा २०२२-२३ मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता सचिवालय जिमखाना, मुंबई येथे दि ३० ते ३१ जानेवारी, २०२३ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या अधिकारी व कर्मचा-यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तसेच निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेल्या राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्याचा संघ सहभागी होण्यासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे होणाऱ्या रु.१,१३,८००/-(रुपये एक लक्ष तेरा हजार आठशे फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या साठी उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. स्पर्धेत सहभागी होण्यासाठी संबंधित विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी, खेळाडू/ प्रशिक्षक/ व्यवस्थापक यांना दिनांक २० ते २२ फ़ेब्रुवारी, २०२३ या कालावधीत प्रशिक्षण शिबिरासाठी व दिनांक २४ ते २८ फ़ेब्रुवारी, २०२३ या कालावधीत स्पर्धेत सहभागी होण्यासाठी दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०२३ (म.पु.) पासून कार्यमुक्त करावे व या खेळाडूंच्या सेवा सचिवालय जिमखान्यास उपलब्ध करून देण्यात याव्यात. संघातील प्रत्येक खेळाडूने व व्यवस्थापकाने ते ज्यांच्या अधिपत्याखाली काम करीत असतील त्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांची परवानगी घेणे आवश्यक आहे.

४. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ मधील तरतूदींनुसार संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची दि. २० ते २८ फ़ेब्रुवारी, २०२३ (प्रशिक्षण शिबीर, स्पर्धा व प्रवास) या काळातील कार्यालयीन अनुपस्थिती "कर्तव्य कालावधी" म्हणून समजण्यात यावी. तसेच त्यांच्या

प्रवासभत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या/कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, मुंबईबाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास/दैनिक भत्ता व इतर सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक -एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ अन्वये मंजूर करण्यात यावी. या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनात सादर करणे आवश्यक राहिल.

५. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी/कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै,१९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी.

६. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच शिल्लक राहील्यास, शिल्लक रक्कम उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

७. यासाठी होणारा खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी "२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६) (०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परीक्षीतलेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र"ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२०१४४८०२२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramdas Ganpat Dhumal

Digitally signed by Ramdas Ganpat Dhumal
DN: CN = Ramdas Ganpat Dhumal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2023.02.20 15:00:45 +05'30'

**( रामदास धुमाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. मा. मंत्री,क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक,मुंबई.
४. मा.राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.

५. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
६. सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फ़त)
११. सर्व जिल्हा व कोशागार अधिकारी . (क्रीडा संचालनालयामार्फ़त)
१२. वरिष्ठ कोशागार अधिकारी . (क्रीडा संचालनालयामार्फ़त)
१३. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे.
१४. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी . (क्रीडा संचालनालयामार्फ़त)
१५. मानद महासचिव,सचिवालय जिमखाना,मुंबई-४०० ०३२
१६. संबधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालय (सचिवालय जिमखान्यामार्फ़त)
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

**विवरणपत्र "अ"**

दिनांक २४ ते २८ फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत चंदिगड येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा टेबल टेनिस स्पर्धा २०२२-२३ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या टेबल टेनिस संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| अ.क्र. | **खेळाडूचे नाव व पदनाम** | **टॅकसूट** | **किटबॅग** | **विभाग/ कार्यालय** |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. विशाल नरवाडे, सहा. जिल्हाधिकारी | होय | होय | जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक. |
| २ | श्री. अनिल शं. बंदेल, राज्य क्रीडा मार्गदर्शक | नाही | नाही | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, जिल्हा क्रीडा संकुल, नांदेड |
| ३ | डॉ. मनीष बत्रा, दंत शल्य चिकित्सक | होय | होय | ग्रामीण रुग्णालय, लाखणी, जिल्हा- भंडारा. |
| ४ | श्री. नितीन डोळस, नाईक | होय | होय | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ५ | डॉ. अशोक कळंबे, प्राध्यापक | होय | होय | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर. |
| ६ | श्री. मंगेश स. जगदाळे, महसूल सहायक | नाही | नाही | तहसिल कार्यालय, मलकापूर, जि. बुलढाणा. |
| ७ | श्री. सचिन सु. पुरी, राज्य क्रीडा मार्गदर्शक | होय | होय | जिल्हा क्रीडा कार्यालय, विभागीय क्रीडा संकुल, गारखेडा स्टेडियम, औरंगाबाद. |
| ८ | श्रीमती स्नेहल भोळे, सहा. अभियंता (स्थापत्य) गट-ब | होय | होय | बेंबळा पाटबंधारे विभाग, यवतमाळ, जिल्हा - यवतमाळ. |
| ९ | श्रीमती पुजा जाधव, महसूल सहायक | नाही | नाही | जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा. |
| १० | श्रीमती शुभांगी पं. जुनघरे, मृद सर्वेक्षण अधिकारी | होय | होय | पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे, मृद सर्वेक्षण विभाग, नागपूर. |
| ११ | श्रीमती चित्रा दा. मेश्रे, स्विय सहाय्यक | होय | होय | विदर्भ विकास मंडळ, नागपूर. विभाग (मूळ आस्थापना विभागीय आयुक्त, नागपूर) |
| १२ | सौ. अंजली मातोडकर, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ | नाही | नाही | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचे कार्यालय, सार्वजनिक बांधकाम विभाग, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई. |
| १३ | श्रीमती मंगला गौ. मोरे, अव्वल कारकून | होय | होय | जिल्हा पुरवठा अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, औरंगाबाद. |
| १४ | श्री. सुनिल कोळी विक्रीकर निरिक्षक (प्रशिक्षक) | होय | होय | राज्यकर उपायुक्त, (जनसंपर्क), वस्तू व सेवा कर विभाग, माझगांव, मुंबई. |
| १५ | श्री. प्रताप सं. माडकर, कक्ष अधिकारी (व्यवस्थापक ) | होय | होय | महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई. |

## विवरणपत्र "ब"

दिनांक २४ ते २८ फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत चंदिगड येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा टेबल टेनिस स्पर्धा २०२२-२३ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या टेबल टेनिस संघासाठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | तपशील | रुपये |
|---|---|---|
| **अ)** | **निवड चाचणी आयोजनापूर्वीचा खर्च.** | |
| १ | निवड चाचणीसाठी टेबल आणणे, मांडणे व त्यासाठी टेम्पो खर्च (हमाली सह) | २००० |
| २ | लाईट शेड्स लावणे, प्रकाश योजनेवर करावा लागलेला खर्च. | ५०० |
| ३ | लेखन व मुद्रण सामुग्री खर्च. | १००० |
| ब) | **निवड चाचणी आयोजनाचा खर्च.** | |
| १ | प्रमुख पंच व इतर दोन पंच यांचे मानधन. (१०००+ ५००+५००) | २००० |
| २ | निवड चाचणीस उपस्थित जिमखाना पदाधिकारी/ प्रतिनिधी व पंच यांच्याकरिता चहा/ अल्पोपहारावरील खर्च. | २००० |
| ३ | निवड चाचणीसाठी २ डझन टेबल टेनिस चेंडू. (3x8 Box x Rs.325/-) (Stag T.T. Ball 3 Star) | २६०० |
| **क)** | **प्रशिक्षण शिबीराकरिता खर्च.** | |
| १ | **आयोजनाचा खर्च.** (३ दिवसाचा प्रशिक्षण शिबीराकरिता खेळाडू, व्यवस्थापक/ प्रशिक्षक यांच्या चहा व अल्पोपहारावरील खर्च.) (१००x१५x३) | ४५०० |
| २ | ३ दिवसाच्या प्रशिक्षण शिबीरासाठी प्रशिक्षकांचे मानधन व प्रवास भाडे. | ३००० |
| ३ | २ डझन टेबल टेनिस चेंडू. (Stag T.T. Ball 3 Star) (3x8Box x Rs.325/-) | २६०० |
| ४ | औषधे (रेली स्प्रे) व किरकोळ. | ५०० |
| **ड)** | **संघासाठीसाहित्य** | |
| १ | २ टेबल टेनिस बॅट रु. ५,०००/- प्रमाणे. | १०००० |
| २ | २ डझन टेबल टेनिस चेंडू. (Stag T.T. Ball 3 Star) (3x 8Box x Rs.325/-) | २६०० |
| **इ)** | **वैयक्तीक क्रीडा साहित्य खरेदीसाठी होणारा खर्च:-** | |
| १ | ११ ट्रॅकसूट रु. ९००/- प्रमाणे. | ९९०० |
| २ | ११ किटबॅग रु. ५००/- प्रमाणे. | ५५०० |
| ३ | ३० टि शर्टस् रु. ६००/- प्रमाणे. | १८००० |
| ४ | ३० शॉटर्स रु. ६००/- प्रमाणे. | १८००० |
| ५ | १५ जोडी पायमोजे प्रत्येकी रु. १००/- प्रमाणे. | १५०० |
| ६ | १५ बूटांचे जोड प्रत्येकी रु. १५००/- प्रमाणे. | २२५०० |
| ७ | १५ टॉवेल्स प्रत्येकी रु. १००/- प्रमाणे. | १५०० |
| ८ | ७ ब्लॅक पॅन्थर सपोर्टर रु. ३००/- प्रमाणे. | २१०० |
| **फ)** | **प्रथमोपचाराकरिता खर्च.** | |
| १ | ग्लुकोज/औषधे/ स्प्रे इत्यादीसाठी खर्च. | ५०० |
| २ | किरकोळ खर्च. | १००० |
| | **एकूण रुपये : (रु. एक लाख तेरा हजार आठशे फक्त )** | **१,१३,८००/-** |

**विवरणपत्र - क**

दिनांक २४ ते २८ फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत चंदिगड येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा टेबल टेनिस स्पर्धा २०२२-२३ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या टेबल टेनिस संघाची निवड करण्यासाठी दि. ३० व ३१ जानेवारी, २०२३ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले अधिकारी कर्मचारी खेळाडूंची नावे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूचे नाव व पदनाम | कार्यालयाचा पूर्ण पत्ता |
|---|---|---|
| १ | श्री. विजय महाजन, कृषि सहाय्यक | जिल्हा बीज प्रमाणीकरण अधिकारी, अकोला शिवणी, जिल्हा - अकोला. |
| २ | श्री. विजय कोकरे, राज्यकर अधिकारी | राज्यकर सहआयुक्त, नोडल-३ यांचे कार्यालय, वस्तू व सेवा कर विभाग,येरवडा,पुणे. |
| ३ | श्री. सुहास चं. घस्ती, वरिष्ठ लिपीक | जिल्हा जल संधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सातारा. |
| ४ | श्री. आप्पासो जयसिंग शिंदे, राज्यकर निरीक्षक | राज्यकर सहआयुक्तांचे कार्यालय, वस्तू व सेवा कर विभाग, कोल्हापूर. |
| ५ | श्री. मंगेश स. जगदाळे, महसूल सहायक | तहसिल कार्यालय, मलकापूर, जिल्हा. बुलढाणा |
| ६ | श्री. गोकुळ रा. माहुल, लिपिक टंकलेखक | राज्यकर उपायुक्त,(प्रशासन), वस्तू व सेवा कर कार्यालय, नीमवाडी बायपास रोड, अकोला. |
| ७ | श्री. नितिन हो. डोळस, नाईक | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ८ | श्री.गजानन श्री. जायले, लिपिक | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ९ | डॉ. अशोक कळंबे, प्राध्यापक | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर. |
| १० | डॉ. मनिष एस. बत्रा, दंत शल्य चिकित्सक | ग्रामीण रुग्णालय, लाखाणी, भंडारा. |
| ११ | श्री. पंकज देवरे, अपर जिल्हाधिकारी (अति/ निष्कासन) | जिल्हाधिकारी कार्यालय मुंबई उपनगर जिल्हा, बांद्रा, मुंबई. |
| १२ | श्री. अनिल शं. बंदेल, राज्य क्रीडा मार्गदर्शक | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, नांदेड . |
| १३ | श्री. सचिन सु. पुरी, राज्य क्रीडा मार्गदर्शक | जिल्हा क्रीडा कार्यालय, विभागीय क्रीडा संकुल, गारखेडा स्टेडियम, औरंगाबाद. |
| १४ | श्री. राजेंद्र चं. शाह, विभागीय सहनिबंधक | विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखा परिक्षण) मुंबई विभाग, मुंबई. कोकण भवन, सीबीडी बेलापूर. |
| १५ | श्री. अनिल कुदळे, उप आयुक्त | वस्तू व सेवा कर विभाग कार्यालय, माझगाव, मुंबई. |
| १६ | श्री. सुशिल गर्जे, सह आयुक्त | वस्तू व सेवा कर कार्यालय, बांद्रा, मुंबई. |
| १७ | श्री. प्रशांत साजणीकर, सह सचिव | सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १८ | श्री. सुनिल कोळी, राज्यकर निरिक्षक | राज्यकर उपायुक्त, (जनसंपर्क), वस्तू व सेवा कर विभाग, माझगांव, मुंबई. |
| १९ | श्री. विशाल नरवाडे, सहा. जिल्हाधिकारी | जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक. |
| २० | श्री. प्रताप सं. माडकर, कक्ष अधिकारी | महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| २१ | श्रीमती पुजा मु. जाधव, महसूल सहायक | संगायो विभाग, जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा. |
| २२ | श्रीमती सुवर्णा मोटे, राज्यकर अधिकारी | राज्यकर सहआयुक्त, वस्तू व सेवा विभाग, पुणे. |
| २३ | श्रीमती रागिणी साळूंखे, कर सहायक | राज्यकर सहआयुक्तांचे कार्यालय, वस्तू व सेवा कर विभाग, कोल्हापूर. |
| २४ | श्रीमती चित्रा मेश्रे, स्विय सहायक | विदर्भ विकास मंडळ, नागपूर. (मूळ आस्थापना विभागीय आयुक्त, नागपूर) |

| | | |
|---|---|---|
| २५ | श्रीमती मंगला गो. मोरे, अव्वल कारकून | जिल्हा पुरवठा अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, औरंगाबाद. |
| २६ | कुमारी स्नेहल भोळे, सहाय्यक अभियंता, (स्थापत्य) गट - ब | बेंबळा पाटबंधारे विभाग, यवतमाळ, जिल्हा- यवतमाळ. |
| २७ | श्रीमती शुभांगी प. तुम्मे, कृषी सहायक | जिल्हा कृषि अधिकारी, जिल्हा- नागपूर. |
| २८ | श्रीमती प्रभावती व. उंबरे, महसूल सहायक | सामान्य प्रशासन विभाग, जिल्हाधिकारी कार्यालय, उस्मानाबाद. |
| २९ | श्रीमती छाया बबन थोरात, कृषि सहायक | जिल्हा कृषि अधिकारी, जिल्हा नाशिक |
| ३० | श्रीमती सुजाता गं. गुल्हाने, क्रीडा अधिकारी | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, श्री छत्रपती शिवाजी महाराज जिल्हा क्रीडा संकुल, जळगांव, जिल्हा - जळगांव. |
| ३१ | श्रीमती सुचिता सं. बोदमवाड (बोधगीरे) अव्वल कारकून | जिल्हाधिकारी कार्यालय, (सामान्य प्रशासन) नांदेड. |
| ३२ | श्रीमती मिनाक्षी वंजारी, उपअभियंता | आंतरराज्यीय नियंत्रण मंडळ, सिव्हील लाईन, नागपूर. |
| ३३ | श्रीमती शुभांगी पं. जुनघरे, मृद सर्वेक्षण अधिकारी | पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे, मृद सर्वेक्षण विभाग, नागपूर. |
| ३४ | श्रीमती अंजली मातोडकर, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ | मुख्य वास्तूशास्त्रज्ञ यांचे कार्यालय,सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई. |

Ramdas
Ganpat Dhumal

Digitally signed by Ramdas Ganpat Dhumal
DN: CN = Ramdas Ganpat Dhumal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2023.02.20 15:01:07 +05'30'

( रामदास धुमाळ )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन